सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार योजनेंतर्गत दुसऱ्या हप्त्यात सर्वसाधारण प्रवर्गाकरीता ₹९३.३६ कोटी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राकृवि ०३१९/प्र.क्र.८८/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २० मार्च, २०२०.

**संदर्भ :**

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि. २७/०४/२०१७
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१.०४.२०१९
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ७-१/२०१९- आरकेव्हीवाय, दि. २२/०२/२०१९.
४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०३१९/प्र.क्र.८८/१४-अे, दि.२९/०६/२०१९.
५. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०१९ आरकेव्हीवाय/१, दि. ०४/०३/२०२०.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत सर्वसाधारण राकृवियो करिता (Normal RKVY) केंद्र शासनाने संदर्भांकित संदर्भ क्र. ३ येथील दि. २२/०२/२०१९ रोजीच्या पत्रान्वये राज्यास सन २०१९-२० करिता एकूण ₹४१८.४५ कोटी रक्कमेचे वार्षिक नियतवाटप (Allocation) मंजूर केले असून त्यापैकी रु.३११.२१ कोटी निधी सर्वसाधारण प्रवर्गासाठी उपलब्ध होणार आहे. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाकरिता पहिल्या हप्त्यात केंद्र व राज्य हिश्श्याचा मिळून एकूण ₹ १५५.६१ कोटी निधी संदर्भ क्र. ४ येथील दि. २९/०६/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला आहे.

आता केंद्र शासनाने सर्वसाधारण प्रवर्गाकरिता दुस-या हप्त्यात राज्यास केंद्र हिश्श्याचा ₹९३.३६ कोटी निधी संदर्भ क्र.५ येथील दि.०४/०३/२०२० रोजीच्या पत्रान्वये वितरीत केला असून सदर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः**

१. या शासन निर्णयान्वये सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी सर्वसाधारण प्रवर्गासाठी ₹९३.३६कोटी (रुपये त्र्यान्नव कोटी छत्तीस लाख फक्त) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहेत-

**(रक्कम ₹ कोटी)**

| अ. क्र. | योजनेचे नाव | सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र हिस्याचा ६०% मंजूर निधी |
|---|---|---|
| १. | राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार - सर्वसाधारण राकृवियो (Normal RKVY) | ९३.३६ |

२. परिच्छेद क्र. १ नुसार, राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत केंद्र हिस्याचा ₹ ९३.३६ कोटी निधी (रुपये त्र्यान्नव कोटी छत्तीस लाख फक्त) उपलब्ध करुन दिला असून तो योजनेच्या केंद्र हिस्स्याच्या पुढील लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा :

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा |
|---|---|
| **सर्वसाधारण** | **मागणी क्रमांक डी -३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (८००) इतर खर्च<br>(००) (०९) कृषि उन्नती योजना -<br>राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना) (६० टक्के केंद्र हिस्सा)<br>(२४०१ ८२३५) ३३-अर्थसहाय्य |

३. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेल्या ₹ ९३.३६ कोटी निधीचे कोषागारातून आहरण व वितरणाकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी वितरीत केलेला ₹ ९३.३६ कोटी निधी कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यात (PLA) जमा करावा, या निधीचा प्रकल्प निहाय वितरणाचा तसेच उपरोक्त केंद्र हिश्श्याच्या निधी समरुप राज्य हिश्श्याच्या निधी वितरणाचा आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येईल.

५. राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरिता उपलब्ध होणाऱ्या निधीचा विनियोग करताना दि.२९/०६/२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील सूचना / कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

६. हा शासन निर्णय संदर्भ क्र. २ येथील दि.०१/०४/२०१९ रोजीच्या वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२०१४५१०८०६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c,
serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.03.20 18:03:20 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (पदुम व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. व्यवस्थापकीय संचालक (MSHMPB), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे
८. आयुक्त (पशुसंवर्धन), औंध, पुणे
९. आयुक्त (दुग्धव्यवसाय), वरळी, मुंबई
१०. आयुक्त (मत्स्यव्यवसाय), मरीन ड्राईव्ह, मुंबई
११. महासंचालक, महाराष्ट्र राज्य कृषि शिक्षण व संशोधन परिषद, भांबुर्डा, भोसले नगर, पुणे.
१२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१३. संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१४. संचालक (रेशीम), विभागीय आयुक्तालय परिसर, सिव्हील लाईन्स, नागपूर
१५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, गुलटेकडी, मार्केट यार्ड, पुणे
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, गुलटेकडी, मार्केट यार्ड, पुणे
१७. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
२०. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
२१. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
२२. मा. मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२३. निवड नस्ती.